स्वातंत्र्य सैनिक सन्मान पेन्शन मंजूर
झाल्यास देय होणारी थकबाकीची रक्कम
"स्मॉल सेव्हींग बॉण्ड " च्या स्वरुपात
देण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक - संकीर्ण - १००२/प्र.क्र.१०१/स्वासैक-१
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक - ५.७.२००२

**शासन निर्णय :-**

स्वातंत्र्य सैनिकांना पेन्शन मंजूर झाल्यास त्याच्या मूळ अर्जाच्या दिनांका पासून पेन्शन मंजूर करण्याचे शासनाचे धोरण असल्यामुळे बहुतांशी प्रकरणात देय होणारी थकबाकीची रक्कम फार मोठी असते. ही बाब विचारात घेता संपूर्ण रक्कम स्वातंत्र्य सैनिकास एक रकमी न देता दरमहा ही रक्कम स्वातंत्र्य सैनिकास कशाप्रकारे विभागून देता येईल या बाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि.१९ एप्रिल २००२ रोजी झालेल्या संपूर्ण उच्चाधिकार समितीच्या बैठकीत शासनाने असा निर्णय घेतला आहे की, स्वातंत्र्य सैनिकास देय होणारी थकबाकीच्या एकूण रक्कमे पैकी ६०% रक्कम संबंधीत जिल्ह्यातील पोष्ट ऑफीस मध्ये ५ वर्षासाठी मासिक पेन्शन योजनेत अर्जदाराच्या नावे गुंतविण्यात यावी व उर्वरित ४०% रक्कम अर्जदारास प्रत्यक्षरित्या अदा करण्यात यावी.

वर नमूद केलेली कार्यवाही करण्यासाठी संबंधीत जिल्हाधिका-यांनी

अर्जदाराकडून शपथपत्र स्वरुपात संमत्ती पत्र प्राप्त करुन घेऊन शासनास सादर करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वि.रा.घडेकर)
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
अध्यक्ष,स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती, मंत्रालय, मुंबई,
सभापती,स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती,मंत्रालय,मुंबई,
सदस्य सचिव,स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती,मंत्रालय,मुंबई,
स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समितीचे सर्व सदस्य (पत्राने),
प्रधान सचिव (वि.चौ.अ.- २) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी यांना विनंती करण्यात येते की, पेन्शन मंजूर होणा-या प्रकरणात थकबाकीची रक्कम अदा करण्यापूर्वी शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे अर्जदाराकडून शपथपत्र स्वरुपातील समंति पत्र घेण्यात येऊन शासनास सादर करण्यात यावे.
महालेखापाल,महाराष्ट्र राज्य-१,मुंबई,
महालेखापाल,महाराष्ट्र राज्य-२,नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
संचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय (योग्य ते प्रसिध्दीपत्रक काढण्यासाठी)